**मोफत इफ्ल्यूएंझा लसीकरण मोहिमेसाठी इंन्फ्ल्यूएंझा ए एच १ एन १ लस खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः खरेदी-२०१८/प्र.क्र.२१०/आरोग्य-८

नविन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रूग्णालय कंपांउंड
कॉम्पलेक्स बिल्डींग, १० वा मजला, मुंबई - ४०० ००१.
तारीख: १५ ऑक्टोंबर, २०१८

**वाचा :-**

१) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक संआसे/ इफ्ल्यूएंझा लस /प्रशासकीय मान्यता/न.क्र. /कक्ष-६/५२५-५२६/२०१८, दिनांक ०६.०८.२०१८

२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७

**प्रस्तावना :-**

संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांनी दिनांक ०६.०८.२०१८ च्या पत्रान्वये सन २०१८-१९ मध्ये इन्फ्लूएंझा विरोधी औषधे साथरोग नियंत्रण कार्यक्रम अंतर्गत उपलब्ध राज्य अनुदानातून साथरोग नियंत्रणासाठी आवश्यक असलेल्या मोफत इफ्ल्यूएंझा लसीकरण मोहिमेसाठी इंन्फ्ल्यूएंझा ए एच १ एन १ लस औषधांच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला असून सदर बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांनी दिनांक ०६.०८.२०१८ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानूसार इन्फ्लूएंझा विरोधी औषधे साथरोग नियंत्रण कार्यक्रम अंतर्गत उपलब्ध राज्य अनुदानातून साथरोग नियंत्रणासाठी आवश्यक असलेल्या मोफत इफ्ल्यूएंझा लसीकरण मोहिमेसाठी इंन्फ्ल्यूएंझा ए एच १ एन १ लस औषधांच्या खरेदीस (अंदाजे रक्कम रु.२,७६,३१,८००/-) खरेदी करण्यासाठी खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

**अटी:-**

१) सदरहू औषधांची यंत्रसामग्रीची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदर औषधांचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी यांनी) मान्य केलेल्या विनिर्देशानूसार असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच या बाबींची खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III /उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेला दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/ पुरवठानंतर नमुना तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management ) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सदर खरेदीवर होणारा खर्च खालील नमूद लेखाशिर्षांअंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा .

८) विभागिय संदर्भ सेवा रुग्णालयांकरीता खरेदी करण्यात येणा-या औषधांवर खर्च "२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य- राज्य योजनांतर्गत योजना- प्रादेशिक असमतोल दूर करणे-(०१) (४५) साथरोग नियंत्रण कार्यक्रम -२१, पुरवठा व सामग्री, (२२१० ४२८६) " या लेखाशिर्षांअंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

९) तसेच सदर औषधांच्या खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

संपुर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटींची पुर्तता करण्यात यावी.

११) दिनांक २६.०७.२०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदीनूसार कार्यवाही करण्यात यावी.

**उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पुर्तता करण्याची संपुर्ण जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुख, आरोग्य सेवा संचालनालयाची राहील तसेच आवश्यकते पेक्षा जास्त खरेदी झाल्यास व विनावापर पडून राहील्यास, मागणी नोंदविणारे संबंधीत अधिकारी जबाबदार असतील.**

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानूसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१०१६५३५०७८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha Munjaji Bharose

Digitally signed by Varsha Munjaji Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b708981b5122e87c8346c4cc7468f821, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd85325223aceef69d02bd455b7ca6972491623e0, cn=Varsha Munjaji Bharose
Date: 2019.06.12 14:26:39 +05'30'

**(व. मुं. भरोसे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई

२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. परेल, मुंबई

३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

४) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

५) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

६) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई

८) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर

९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

११) निवडनस्ती (आरोग्य-८)